**पैठण मुख्य डाव्या कालव्यावरील कि.मी. ४६ ते ४७ येथील काटछेद दुरूस्तीचे कामांचे विशेष दुरुस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०२३/ (प्र.क्र.३९४/२०२३)/ सिंव्य(कामे)**
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक : २० ऑगस्ट,२०२४

**वाचा :-**

१. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ,छत्रपती संभाजीनगर यांचे पत्र.जा.क्र.गोमपाविम /सिंचन-२/ विवसू कडा छत्रपती संभाजीनगर/धा-२२ /३१३, दि. ६/०१/२०२३
२. शासन निर्णय - २०१७/५६६/१७/सिंव्य(कामे), दि.३१/०८/२०१८.
३. शासन निर्णय - २०१८/५५१/१७/सिंव्य(कामे), दि.२७/११/२०१८.
४. शासन निर्णय - २०१३/७८५/१३/ सिंव्य (कामे) दि. १/८/२०१९.
५. शासन परिपत्रक- प्रमा २०१३/७८५/१३/ सिंव्य (कामे), दि.१६/९/२०२१.
६. शासन परिपत्रक क्र-प्रमा २०१३/(७८५/१३)/ सिंव्य (कामे), दि १/१/२०१५.
७. शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०२२/प्र.क्र.५१६/२०२२/सिंव्य(कामे) दिनांक १४/०३/२०२३

**प्रस्तावना :-**

जायकवाडी प्रकल्प हा गोदावरी पाटबंधारे विकास महामंडळ, छत्रपती संभाजीनगर अंतर्गत मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, छत्रपती संभाजीनगर अंतर्गत आहे. जायकवाडी प्रकल्प हा महाराष्ट्र राज्याच्या दृष्टीने अत्यंत महत्वकांक्षी प्रकल्प असून याव्दारे अन्न धान्याची तूट भरून काढून त्याबाबतीत राज्य स्वंय:पूर्ण होणे अपेक्षित आहे.जायकवाडी धरणाचे काम १९६५ मध्ये सुरू होवून १९७६ मध्ये पूर्ण झाले.सिंचनाची सुविधा ही १९७६ पासून सुरू झाली.जायकवाडी डावा कालव्यामुळे छत्रपती संभाजीनगर, जालना, परभणी या तीन जिल्हयाचे क्षेत्र सिंचनाखाली येते.पैठण डावा कालवा वर १४१६४० हेक्टर क्षेत्र सिंचनाखाली येते.

पैठण मुख्य डावा कालवा हा ब-याच ठिकाणी भरावात अंशत: भरावात अंशत: खोदकामात तसेच पूर्ण खोदकामात आहे. कालवा साखळी क्रमांक ४६ ते ४७ कि.मी. येथील कालवा भरावात व अंशत: भरावात असून वाहत्या पाण्याच्या दबावामुळे त्या ठिकाणी कालव्याच्या आतील बाजूने मोठया प्रमाणात घसरण झाली आहे. कालव्याची ही घसरण जास्त प्रमाणात असल्याने कालव्याची वहनक्षमता कमी होत असून सिंचन व्यवस्थापनाच्या वेळेस अडचणी निर्माण होवून सिंचन क्षेत्र कमी होत आहे. पायथा ते माथा यापध्दतीने सिंचन राबविण्यात येते परंतू कालवा सुस्थितीत नसल्याने आवश्यकते पेक्षा जास्त पाणी कालव्याव्दारे सोडावे लागत आहे.त्यामुळे धरणातील पाणी साठयावर तसेच कालवा सल्लागार समितीने केलेल्या पाण्याच्या नियोजनावर परिणाम होत आहे.त्यामुळे कालवा भरावाचे तसेच अस्तरीकरणाचे काम नव्याने व कालव्याचे पुर्नजीवन झाल्यास सिंचन व्यवस्थापन सुरळितपणे पार पाडता येईल व मोठया प्रमाणात क्षेत्र सिंचनाखाली आणता येईल.पैठण मुख्य डावा कालवा साखळी क्रमांक कि.मी. ४६ ते ४७ येथील कालवा घसरण झालेल्या भागाचे Toe wall with Lining चे काम प्रस्तावीत केलेले आहे.

सदर कामे पूर्ण झाल्यानंतर कि.मी. ४६ ते ४७ याठिकाणी होणारी पाण्याची गळती बंद होवू शकते. तसेच कालव्याचे पुनर्जीवन झाल्याने त्याच्या मुळ क्षमतेनुसार वहन होवून पाण्याचा वहनव्यय कमी होण्यास मदत होईल.पाण्याचा वहनव्यय कमी झाल्याने कालव्याच्या पुच्छ भागात कमी वेळात पाणी पोहचविणे शक्य होईल.

या पार्श्वभूमीवर पैठण डाव्या कालव्यावरील कि.मी. ४६ ते ४७ येथील काटछेद दुरूस्तीचे कामांचे विशेष दुरुस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्याप्रमाणे शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, छत्रपती संभाजीनगर अंतर्गत पैठण डाव्या कालव्यावरील कि.मी.४६ ते ४७ येथील काटछेद दुरूस्तीचे कामांचे विशेष दुरुस्तीच्या रू. ४,९७,३८,४०९/- (रू.चार कोटी सत्याण्णव लक्ष अडतीस हजार चारशे नऊ फक्त) एवढया खर्चाच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१) तांत्रिक मान्यता, निविदा प्रक्रिया , कामाचे नियोजन व पूर्णत्व, प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत खर्च करणे इ. बाबींसाठी प्रचलित शासन निर्णय / परिपत्रके यांचे पालन करणे बंधनकारक राहिल.

२) प्रस्तावित कामांमुळे होणाऱ्या खोदकाम तोडफोड याव्दारे उपलब्ध होणारे बांधकाम साहित्याचा पूर्ण वापर करुन बचत साधावी.

३) सदर अंदाजपत्रकातील कामांसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ सर्वसाधारणपणे मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही.

४) सदर दुरुस्ती काम पूर्ण झाल्यानंतर प्रकल्पाच्या लाभक्षेत्रांतर्गत यापुर्वी स्थापित पाणी वापर संस्थाकडे लाभक्षेत्र हस्तांतरीत करणेची संपुर्ण जबाबदारी क्षेत्रिय अधिका-यांची राहील.

५) प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी अथवा निविदा विषयक क्षेत्रीय स्तरावरील निर्णयास मान्यता गृहीत धरली जाणार नाही.

६) प्रत्यक्ष सिंचन व पाणीपट्टी वाढविण्याबाबत क्षेत्रिय अधिका-यांनी विशेष प्रयत्न करावेत.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च ४७०० मोठे पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च, ८०-सर्वसाधारण, १९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका विशेष दुरूस्ती/विस्तार व सुधारणा कार्यक्रमा अंतर्गत भाग भांडवली अंशदान (०४)(०५) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (मराठवाडा विभाग) (४७०० ०२६५) (योजनांतर्गत) (कार्यक्रम ) ५४ गुंतवणुका या लेखाशिर्षा खाली टाकुन मंजुर अनुदानातुन भागवावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य (कामे) कार्यासनाच्या नोंदवही मध्ये क्र. -२१ सन २०२४-२५ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय संकेतस्थळावर www.maharashtra.gov.in उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २०२४०८२०१७१००७४९२७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NAMITA GAURAV BASER

Digitally signed by NAMITA GAURAV BASER
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de458a05b5f4b6fb7f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=69D010EE03D01B7C859C5458FEEAF66B1EAE16BC67F5CCB127AE66608DE5FA48, cn=NAMITA GAURAV BASER
Date: 2024.08.20 17:26:37 +05'30'

**( न.गौ.बसेर )**
**शासनाच्या उप सचिव**

**सोबत :- सहपत्र**
**प्रत:-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) मा.उपमुख्यमंत्री (जलसंपदा/वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव,
४) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई
५) मा.उपसभापती,विधानपरिषद, विधानभवन, मुंबई
६) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई
७) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई
८) अ.मु.स. (वित्त) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई,
९) अ.मु.स. (नियोजन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई,
१०) अ.मु.स. (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई,
११) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१२) सचिव (प्रकल्प समन्वय) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१३) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य,मुंबई,
१४) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर,
१५) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, छत्रपती संभाजीनगर
१६) मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक ,लाभक्षेत्र विकास ,जलसंपदा विभाग , छत्रपती संभाजीनगर
१७) आंतर वित्त सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१८) अधीक्षक अभियंता व प्रशासक , लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, छत्रपती संभाजीनगर
१९) कार्यकारी अभियंता, जायकवाडी पाटबंधारे विभाग , नाथनगर (उ) पैठण
२०) सिं.व्य.(कामे) कार्यासन संग्रहार्थ.

**शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०२३/ (प्र.क्र.३९४/२०२३)/ सिंव्य (कामे),**

**दि. २०/ ८ / २०२४ चे सहपत्र**

| Sr.No. | Description of Item | Amount in ( Rs. ) |
|---|---|---|
| 1 | C - Works (Excluding Royalty) | 40067084 |
| 2 | Royalty | 1657908 |
| 3 | 1 % Insurance | 400671 |
| 4 | 18 % GST | 7212075 |
| 5 | 1% Testing Charges | 400671 |
| | **Total Rs.** | 49738409 |

NAMITA GAURAV BASER

Digitally signed by NAMITA GAURAV BASER
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=69D010EE03D01B7C859C5458FEEAF66B1EAE16BC67F5CCB127AE66608DE5FA48, cn=NAMITA GAURAV BASER
Date: 2024.08.20 17:27:00 +05'30'

**( न.गौ. बसेर )**
**शासनाच्या उपसचिव**